सन -२०२३२४ मध्ये राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेकरीता निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: तंनिवि-१५२३/प्र.क्र.१३३/२३/तांशि-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक: १४ मार्च, २०२४.

**वाचा: -**

१) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन ज्ञापन क्र.तंनिवि-१५२३/प्र.क्र.९५/२३/तांशि-३, दि.१७ मे, २०२३.
२) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन ज्ञापन क्र.तंनिवि-१५२३/प्र.क्र.९५/२३/तांशि-३, दि.१८ सप्टेंबर, २०२३.
३) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन ज्ञापन क्र.तंनिवि-१५२३/प्र.क्र.१३३/२३/तांशि-३, दि.२१ नोव्हेंबर, २०२३
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०४ मार्च, २०२४.
५) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.१८/तंशिसं/शा.पत्र/२०२३-२४/११५, दि.१३ मार्च, २०२४.

**प्रस्तावना:-** सन २०२३-२४ मध्ये “राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना” या योजनेसाठी सुधारित अंदाजानुसार रु.९५९.९० कोटी इतक्या निधीपैकी अवितरीत असलेला रु.०.२० कोटी इतका निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव संचालक, तंत्रशिक्षण यांनी संदर्भाधीन दि.१३ मार्च, २०२४ च्या पत्रान्वये सादर केला आहे. त्यास अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

“राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना” या योजनेंतर्गत तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्त्याखालील व्यावसायिक अभ्यासक्रमांकरीता प्रवेश घेतलेल्या व पात्र ठरलेल्या लाभार्थी विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीची रक्कम अदा करण्याकरीता चालू वर्षी सुधारित अंदाजानुसार रु.९५९.९० कोटी इतक्या निधीपैकी अवितरीत असलेल्या निधीतून रु.२०,००,०००/- (अक्षरी रुपये वीस लक्ष फक्त) इतका निधी संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांना “खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून” आहरित व वितरीत करण्यास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच आहरित व वितरीत करावयाच्या उद्दिष्टनिहाय निधीचा तपशिल खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | उद्दिष्टे | मूळ अर्थसंकल्पित निधी | सुधारित अंदाजानुसार निधी | चालू वर्षी वितरीत केलेला निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | ३४, शिष्यवृत्ती/विद्यावेतने | ९५९,००,००,०००/- | ९५९,००,००,०००/- | ९५८,९०,००,०००/- | 10,00,000/- |
| २ | १३, कार्यालयीन खर्च | १,००,००,०००/- | ९०,००,०००/- | ८०,००,०००/- | 10,00,000/- |
| | **एकूण** | ९६०,००,००,०००/- | ९५९,९०,००,०००/- | **959,70,00,000/-** | २०,००,०००/- |

२. अटी:-

१) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.टीईएम-२०१५/प्र.क्र.५०१/तांशि-४, दि.१३ ऑक्टोबर, २०१६, क्र.टीईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.१५ एप्रिल, २०१७ व क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३२/ तांशि-४, दि.७ ऑक्टोबर, २०१७ तसेच या संदर्भातील इतर आदेशामध्ये नमूद अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

२) केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेतील पात्र प्रवेशित विद्यार्थ्यांनाच शैक्षणिक शुल्क शिष्यवृत्तीचा लाभ देण्यात यावा. ही रक्कम पात्र विद्यार्थ्यांच्या महाडीबीटी पोर्टलच्या माध्यमातून बँक खात्यात थेट जमा होईल या दृष्टिने कार्यवाही करावी. तथापि, न्यायालयीन निर्णयानुसार योग्य ती कार्यवाही करता येईल.

३) संचालक, तंत्रशिक्षण व सर्व विभागीय तंत्रशिक्षण सहसंचालकांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील नमुन्यादाखल काही संस्थाना भेट देऊन या योजनेची अंमलबजावणी व्यवस्थितरीत्या होत असल्याची वेळोवेळी तपासणी करावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४) यापूर्वीच्या तपासणी अहवालात काही त्रुटी/अनियमितता आढळून आली असल्यास ती तात्काळ दूर करण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना संचालक, तंत्रशिक्षण यांनी करावी. चूकीची अथवा खोटी माहिती भरुन शासनाकडून शिक्षण शुल्क प्राप्त करुन घेतले असल्याचे निदर्शनास आले असल्यास अशी रक्कम वसूल करुन ती शासनाकडे जमा करण्यात यावी. तसेच यामध्ये संस्था दोषी आढळल्यास सदर संस्थेच्या अभ्यासक्रमाची मान्यता काढून घेण्यासाठी अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेकडे अथवा अन्य सक्षम प्राधिकरणाकडे शिफारस करणे/फसवणूकीचा गुन्हा दाखल करणे या व अशा स्वरुपाची कडक कार्यवाही करण्यात यावी.

५) या शासन निर्णयाच्या दिनांकापासून दिवसाच्या १५ आत निधीचे वाटप करावे व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. निधीचे वाटप करण्यास विलंब करु नये. याबाबतची जबाबदारी संचालक, तंत्रशिक्षण यांची राहील.

३. सदर योजनेसाठी होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-३, मुख्य लेखाशिर्ष २२०३-तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण-१०७, शिष्यवृत्ती (००), (००)(०६) राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना, (कार्यक्रम) २२०३ ०७४८" या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व चालू आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२ व २०२२-२३ मध्ये पात्र ठरलेल्या ज्या विद्यार्थ्यांची शिष्यवृत्तीची रक्कम प्रलंबित आहे, अश्या विद्यार्थ्यांची प्रलंबित रक्कम या आदेशान्वये वितरीत केलेल्या निधीतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदरहू रकमेतून प्रलंबित रक्कम वितरीत केल्यानंतर तरतूद शिल्लक राहिल्यास, ती सन २०२३-२४ च्या लाभार्थी विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीकरीता उपयोगात आणावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.४/०३/२०२४ च्या शासन परिपत्रकान्वये प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे .

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा सांकेतांक २०२४०३१४२१४४५३७५०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANALI MILIND SAMANT

Digitally signed by MANALI MILIND SAMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=e4e402a7e3426729716afaf506c8f4a9d1528c744234b2ca1302837eaee0ebdd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C63B0A0419F0EB37099DACA08E4CCCCE3BF49154BF43E8881E68AC2CA3A46392, cn=MANALI MILIND SAMANT
Date: 2024.03.18 15:50:22 +05'30'

**(मनाली सामंत)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) सर्व विभागीय तंत्रशिक्षण सह संचालक. (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, बृहन्मुंबई.
७) नियोजन विभाग/वित्त विभाग, व्यय-५/अर्थसंकल्प-८, मंत्रालय, मुंबई.
८) कक्ष अधिकारी/तांशि-४, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव/अर्थसंकल्प, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती/तांशि-३.